**शेंदुर्णी ता. जामनेर जि. जळगाव येथे सोनद नदीवर मशिदीजवळ पूर संरक्षक भिंत बांधण्यास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: सुप्रमा-२०१७/ (प्र.क्र. २९७/२०१७)/ सिं.व्य.(महसूल)**
मंत्रालय, मुंबई ४०००३२,
दिनांक: १ सप्टेंबर , २०१८.

**वाचा** : १) शासन निर्णय क्र. पुसंभि-२०१६/(प्र.क्र.६५/२०१६)/सिं.व्य.(महसूल) दिनांक २२ मार्च, २०१६
२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांचे पत्र क्र.कासं /तापाविमं/प्रशा-७/२६५४/२०१७, दि. ९.६.२०१७

**प्रस्तावना :-**

तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव अंतर्गत शेंदुर्णी, ता.जामनेर, जि. जळगाव हे गांव सोनद नदीच्या तीरावर वसलेले आहे. सोनद नदी ही वाघुर नदीची प्रमुख उपनदी आहे. सोनद नदीला येणाऱ्या पुरामूळे नदीकाठ मोठया प्रमाणावर पोखरला जात आहे. यामुळे नदी काठावरील मशिद व काही लोकवस्तीला पुराचा धोका निर्माण होवू शकतो. हे काम सोनद नदीच्या पुराच्या विसर्गामुळे मशिद व काही लोकांच्या जिवीतास व मालमत्तेस धोका होवू नये, याकरीता सदर कामाची मागणी ग्रामपंचायत शेंदुर्णी, ता.जामनेर यांनी ठराव क्र. १२, दि. १.५.२०१५ व ठराव क्र ४/३, दि.२७.११.२०१५ नुसार केलेली होती. सोनद नदीवर मशिदीजवळील पूर संरक्षक कामाच्या अंदाजपत्रकास जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र. प्रशामा-२०१६/(प्र.क्र. ६५/२०१६)/सिं.व्य.(म.), दि. २२.३.२०१६ अन्वये रू. ९०,१०,८४८ /- अंदाजीत खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

२. दिनांक ०१.११.२०१६ पासून शासनाने जलसंपदा विभागाची नविन सामाईक दरसूची लागू केल्याने सदरच्या कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

३. या शासन निर्णयान्वये तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव अंतर्गत शेंदुर्णी, ता. जामनेर, जि. जळगाव येथे सोनद नदीवर मशिदीजवळ पूरसंरक्षक भिंत बांधण्याच्या कामासाठी रू. १,२४,४०,७१२ /- व अनुषंगिक खर्च रू. ६२,२०,३५/-अशा एकूण रू. १,३०,६२,७४८/- (रू. एक कोटी तीस लाख बासस्ट हजार सातशे अठठेचाळीस फक्त) एवढया खर्चाच्या किंमतीस खालील अटींच्या अधिन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. शासन निर्णय क्र. प्रशामा-२०१६/ (प्र.क्र. ६५/२०१६)/सिं.व्य.(म.), दि. २२.३.२०१६ अन्वये प्राप्त प्रशासकीय मान्यतेची किंमत रु. ९०,१०,८४८/- इतकी होती, सुधारित प्रशासकीय मान्यतेसाठीच्या अंदाजपत्रकाची किंमत रु. १,३०,६२,७४८/- इतकी येत असून प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा रुपये ४०,५१,९००/- इतकी (४४.९७ %) वाढ होत आहे. सुधारित अंदाजपत्रकातील वाढीचा विस्तृत तपशील **पुढील** प्रमाणे आहे.

| अ.क्र. | तपशील | प्र.मा. किंमतीतील तरतुद (रुपये) | सुधारित किंमत (रुपये) | दरसुची बदलामुळे झालेली निव्वळ वाढ |
|---|---|---|---|---|
| १ | क - कामे | ८,५८१,७६० | १,२४,४०,७१२ | ३८,५८,९५२ |
| २ | **एकूण** | ८,५८१,७६० | १,२४,४०,७१२ | **३८,५८,९५२** |
| i | विमा १% | ८५८१८ | १,२४,४०७ | ३८५८९ |
| ii | गुण नियंत्रण | १७१६३५ | २,४८,८१४ | ७७१७९ |
| iii | आकस्मिक खर्च | १,७१६३५ | २,४८८१४ | ७७१७९ |
| ३ | **अनुषंगिक कामे** | ४,२९०८८ | ६,२२०३५ | **१९२९४७** |
| ४ | **सर्व एकूण** | **९,०१०,८४८** | **१,३०,६२,७४८** | **४०५१८९९** |

अ) शासन परिपत्रक क्र.एफडीडब्ल्यु-१०९२/(१७०)/सिं.व्य.(कामे), दि.७.८.१९९२ मधील तरतुदी नुसार कार्यवाही करावी.

ब) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू-१०८९/२४३/८९/सिंव्य (कामे), दि. २१.९.१९८९ नुसार पूर रेषा आखणी केल्यानंतरच पूर संरक्षक भिंतीची संरेखा निश्चित करावी.

क) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/ संकल्पने, दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

ड) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे.

इ) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधीतांनी विनामोबदला उपलब्ध करून द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची दक्षता घ्यावी.

ई) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल, याची दक्षता नियोजनात घ्यावी.

प) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक भिंत शेंदुर्णी ता.जामनेर ग्रामपचांयतीने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दूरूस्ती करावयाची आहे. काम सुरू करण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र शेंदुर्णी ग्रामपंचायतकडून प्राप्त करून घ्यावे.

फ) सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासून कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

ग) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे. सदर कामे करण्याकरीता भौतिक व आर्थिक नियोजन करुन कार्यपूर्ततेबाबत विविध टप्प्यांचे दिनांकासहीत (Miles stones) निर्धारित करण्यात यावे. Miles stones करणे अपेक्षित असून जर

त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penailty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी.

५. प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७११-पुरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०२) तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव भागभाडवली अंशदान (४७११ ०२१८ )(योजनांतर्गत) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

६) याकामास प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसूल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ४ /सन २०१८-२०१९ वर नोंदविण्यात आलेली आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा औनपचारिक संदर्भ क्र.१६९/व्यय १२ दिनांक ११/७/२०१८ व नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र १०३/ कार्यासन १४३४ दिनांक १८/६/२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे .

८. प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०१८०९०४१६०७१२८४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Jagannath Savane

Digitally signed by Sanjay Jagannath Savane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eecf658e3610fa137d1ea1fd3304d639f1d5384d08303b49875a1fb41cb9c5b8, serialNumber=86f57086a2beec37477c2f6210fb8a27626ca243a845ea1a73f70cf31be98102, cn=Sanjay Jagannath Savane
Date: 2018.09.04 16:08:16 +05'30'

**( सं. ज. सवने )**
कार्यासन अधिकारी

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
८) अप्पर मुख्य सचिव, (वित्त) स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अप्पर मुख्य सचिव, ( नियोजन ) स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

११) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) महालेखापाल-१ (लेखावअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१३) महालेखापाल-२ (लेखावअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१४) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव,
१५) मुख्यअभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव,
१६) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१७) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगाव,
१८) कार्यकारी अभियंता, जळगाव पाटबंधारे विभाग, जळगाव,
१९) सिं.व्य.(महसूल) कार्यासन संग्रहार्थ.